**मुंबई पोलीस दलाकरिता "माउंटेड पोलीस" या युनिटची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी रु.३,३५,४३०/- इतका निधी फेरवितरणाने उपलब्ध करुन देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-३११८/प्र.क्र.१३२/पोल-३**

गृह विभाग, मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : अेपीओ-३११८/प्र.क्र.१३२/पोल-३, दि.२८.०२.२०१९.
२. शासन शुद्धिपत्रक, गृह विभाग, क्रमांक: अेपीओ-३१२०/प्र.क्र.५४/पोल-३, दि.२५.०५.२०२१.
३. पोलीस उप आयुक्त,सशस्त्र पोलीस मरोळ कार्यालयाचे क्र:O.W.७४/DCP/LA४/STENO/२०२२, दि.२९/०४/२०२२ रोजीचा प्रस्ताव.
४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.व्यअस-२०२२/प्र.क्र.१२०/अर्थसंकल्प, दि.१९.१०.२०२२
५. शासन निर्णय, गृह विभाग, क्र: अेपीओ-३११८/प्र.क्र.१३२/पोल-३, दि.१५.१२.२०२३
६. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाचे पत्र क्र.CP/D.१४/(PJS)/Budget/८६/२०२४, दि.०१.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल यांच्या अधिपत्याखालील पोलीस उप आयुक्त, सशस्त्र पोलीस, मरोळ, मुंबई यांच्या अखत्यारित कार्यरत असलेल्या "माउंटेड पोलीस" या युनिटची रु.२३,४१,८०९/- ची देयके अदा करण्यास "मागणी क्र.बी-१, २०५५(०२)(०१) शहर पोलीस आस्थापना (२०५५००९७), ५०-इतर खर्च" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यास संदर्भाधीन क्र.५ च्या शासन निर्णयान्वये कार्योत्तर मान्यता देण्यात आली आहे.

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाने संदर्भाधीन क्र.६ च्या दि.०१.०३.२०२४ रोजीच्या पत्राद्वारे उपरोक्त लेखाशिर्ष २०५५००९७-५० (इतर खर्च) यामध्ये वित्तीय वर्ष २०२३-२४ करीता मंजूर केलेल्या अनुदानातून रु.२३,४१,८०९ पैकी रु.२०,०६,३७९/- इतके अनुदान खर्च करण्यात आले आहे. तथापि, सद्यस्थितीत या उद्दिष्टांमध्ये अनुदान शिल्लक नसल्यामुळे लेखाशिर्ष २०५५००९७-१८ (साप्ताहिक सुट्टी) मधून उर्वरित रक्कम रु.३,३५,४३०/- इतके अनुदान लेखाशिर्ष २०५५००९७-५० (इतर खर्च) या उद्दिष्टांतर्गत फेरवितरणाद्वारे उपलब्ध करुन देण्याची विनंती पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाने संदर्भाधीन क्र.६ येथील पत्राद्वारे केली आहे. त्यानुषंगाने शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल यांच्या अधिपत्याखालील पोलीस उप आयुक्त, सशस्त्र पोलीस, मरोळ,मुंबई यांच्या अखत्यारित कार्यरत असलेल्या "माउंटेड पोलीस" या युनिटची संदर्भाधीन क्र.५ च्या शासन निर्णयान्वये कार्योत्तर मान्यता देण्यात आलेल्या रु.२३,४१,८०९/-च्या देयकांपैकी शिल्लक रु.३,३५,४३०/- ची देयके अदा करण्यासाठी लेखाशिर्ष २०५५००९७-१८ (साप्ताहिक सुट्टी) मधून उर्वरित रक्कम रु.३,३५,४३०/- (रुपये तीन लाख पस्तीस हजार चारशे तीस फक्त) इतके अनुदान लेखाशिर्ष २०५५००९७-५० (इतर खर्च) या उद्दिष्टांतर्गत पुढीलप्रमाणे फेरवितरणाद्वारे उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(रु. हजारात)**

| **मागणी क्र.बी-१, २०५५(०२)(०१) शहर पोलीस आस्थापना (२०५५ ००९७)** | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| लेखाशिर्ष | उद्दिष्ट | सुधारित अर्थसंकल्पीय अंदाज २०२३-२४ | प्रत्यक्ष प्राप्त अनुदान | फेरवितरणाद्वारे कमी केलेले अनुदान | फेरवितरणाद्वारे वाढविलेले अनुदान | फेरवितरणानंतरचे अनुदान |
| २०५५००९७ | २०५५००९७-१८ (साप्ताहिक सुट्टी) | २८३१९ | १३३१८.५ | -३३५.४३० | -- | २७९८३.५७० |
| | २०५५००९७ -५० (इतर खर्च) | ६३००० | ६३००० | -- | +३३५.४३० | ६३३३५.४३० |

३. सदरचा खर्च "मागणी क्र.बी-१, २०५५(०२)(०१) शहर पोलीस आस्थापना (२०५५ ००९७), ५०-इतर खर्च" या लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात फेरवितरणाने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारिक संदर्भ क्र.२७६/२०२४/ व्यय-७, दि.२७.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३०१६२४२५०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc1734237 79d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2024.03.30 16:33:55 +05'30'

**( रुपाली कबरे )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

९) अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल, मुंबई.

१०) पोलीस उपायुक्त, सशस्त्र पोलीस, मरोळ, मुंबई.

११) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

१२) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.

१५) वित्त विभाग (व्यय-७)/वित्तीय सुधारणा-१/आ.पु.क.

१६) कक्ष अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७) निवड नस्ती, पोल-३.